62D:\PUSHPA\PRS2074

गडचिरोली येथे नवीन जिल्हा कारागृह
बांधण्यास प्रशासकीय मान्यता देणे बाबत

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्र.:बीएलडी/०१२०/१/प्र.क्र.२१७/पिआरएस-२
मंत्रालय, मुंबई- ४०००३२, दि.१७ जुलै, २००३.

**पहा:-** १) कारागृह महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य पुणे , यांचा प्रस्ताव क्र. बीएलडी/गडचिरोली १९३/८१२४/कक्ष-३, दिनांक १६.११.२००२

२) वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र: १०००/प्र.क्र. ४६/२००१/विनिमय दिनांक ११..७.२००१

३) क्रिमिनल रिट पिटीशन क्र. १७६/२००२ उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर

**शासन निर्णय:-** गडचिरोली जिल्हयातील असणारे बंदी हे चंद्रपूर जिल्हा कारागृह व नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे ठेवले जातात. परिणामी बंदीच्या नातेवाईकांना व त्यांच्या वकीलांना बंद्यांच्या भेटी करीता चंद्रपूर व नागपूर येथील कारागृहास भेटी द्याव्या लागतात. त्यामुळे त्यांची फार गैरसोय होत असुन या व्यतिरिक्त गडचिरोली येथील न्यायालयात बंद्यांना हजर करण्यासाठी पोलीस यंत्रणेवर ताण पडत असुन शासनास नाहक आर्थिक नुकसान सहन करावे लागत आहे. त्या करीता गडचिरोली येथे नवीन जिल्हा कारागृह बांधणे आवश्यक असुन त्यास प्रशासकीय मान्यता मंजूर करावी अशी विनंती कारागृह महानिरीक्षक यांनी शासनास केली आहे.

२. गडचिरोली येथे नवीन जिल्हा कारागृह बांधण्यास येणारा खर्च, खर्चाचे अंदाजपत्रक व बांधकामाचा आराखडा ( नकाशे)हा अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग मंडळ गडचिरोली यांनी तयार केले असुन त्यांच्या मान्यतेनंतर सदरचे अंदाजपत्रक व प्रस्ताव कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास मंजूरीसाठी सादर केले आहे .सदर प्रस्तावातील कारागृह परिसरात काम करण्याकरिता कंटेन्जी १५% अधिक तरतूद संगणकीकरण तसेच गुण नियंत्रण यामध्ये कपात करून सुधारित रु. १३,४७,९१,५००/- (रुपये तेरा कोटी सत्तेचाळीस लाख एक्याण्व हजार पाचशे फक्त ) इतक्या रकमेच्या खर्चास /अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभाग व वित्त विभागाने प्रशासकीय मान्यता दर्शविली आहे.

३. गडचिरोली येथे नविन जिल्हा कारागृह बांधण्याच्या प्रस्तावाचा समावेश केंद्रपुरस्कृत (७५:२५) कारागृह सुधारणा योजना या योजनेतर योजनेत केलेला असून सदर बांधकामाच्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशास मान्यता देण्याबाबतची बाब काही काळ शासनाच्या विचाराधीन होती. यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करून शासन, विनिय अधिकार नियम पुस्तीका १९७८ भाग पहिला उपविभाग तीनच्या परिशिष्ठातील अनुक्रमांक ४, परिच्छेद क्र. २७ (२) व रकाना क्र. ५ व ६ मधील अटीच्या अधिन राहुन, तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र:१०००/प्र.क्र. ४६/२००१/विनिमय, दिनांक ११.७.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करून शासन या आदेशाव्दारे वरील प्रस्तावास व त्यासाठी येणा-या रु. १३,४७,९१,५०० ( रुपये तेरा कोटी,सत्तेचाळीस लक्ष एक्याण्व हजार पाचशे फक्त) च्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या

नकाशास प्रशासकीय मान्यता मंजूर करीत आहे. तथापि अर्थसंकल्पात प्रत्यक्ष निधीची तरतुद झाल्या खेरीज वरील बांधकामास सुरवात करु नये.

४. या साठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५ मुख्यलेखाशीर्ष "२०५६- तुरुंग - १०१ तुरुंग- केंद्र पुरस्कृत योजना (००) (०१) कारागृह सुधारणा योजना ( २०५६-०१८-०) " योजनेत्तर दत्तमत" या लेखाशीर्षाखाली खर्च टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या समंतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर: ६११/२००३/व्यय ८ व क्र. २८४७/प्र.क्र. ६२५/अर्थ-५० दिनांक १८.६.२००३ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(स्वाक्षरी)
(र.ना. माळी)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
कारागृह उपमहानिरीक्षक ( मुख्यालय) महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक ( पूर्व विभाग) मध्यवर्ती कारागृह, नागपूर
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, गडचिरोली
महालेखापाल महाराष्ट्र -१ ( लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
महालेखापाल महाराष्ट्र -२( लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
जिल्हा कारागार अधिकारी पुणे'नागपूर'चंद्रपूर व गडचिरोली
वित्त विभाग व्यय-८ व अर्थ-१० मंत्रालय, मुंबई
सार्वजनिक बांधकाम विभाग इमारत-२ व अर्थ-२ मंत्रालय, मुंबई
अवर सचिव, गृह विभाग (तीपुडी-१) मंत्रालय समोर मुंबई
निवडनस्ती गृह विभाग/पिआरएस-२